उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद यांचे अधिपत्याखालील दंत चिकित्सा विभागातील उपजिल्हा रुग्णालये व ग्रामीण रुग्णालये येथील २८ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२०/प्र.क्र.१८५/आरोग्य-४,
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख : २० ऑगस्ट, २०२०.

वाचा :-

१) वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२०/प्र.क्र.६२/कोषा प्रशा-५, दि.३१.०३.२०२०
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२०.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : अपदे-२०१९/प्र.क्र.१३९/आरोग्य-४, दि.१०.१०.२०१९.
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : अपदे-२०१९/प्र.क्र.१४६/आरोग्य-४, दि.१०.१०.२०१९.
५) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक : अपदे-२०१९/प्र.क्र.१४०/आरोग्य-४, दि.१४.१०.२०१९.
६) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/कक्ष-८अ/अस्थाई पदे/९०३३-३४/२०२०, दि.१९.०८.२०२०.

शासन निर्णय :-

उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद यांचे अधिपत्याखालील दंत चिकित्सा विभागातील उपजिल्हा रुग्णालये व ग्रामीण रुग्णालये येथील २८ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०१९ ते दि.२९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. त्यानंतर वित्त विभागाने उपरोक्त अ.क्र.१ येथील दि.३१ मार्च, २०२० च्या शासन परिपत्रकान्वये कोविड-१९ या आजारामुळे निर्माण झालेल्या प्रशासकीय अडचणीमुळे, सर्व विभागांच्या अस्थायी पदांना दि.३१.०५.२०२० पर्यंत

मुदतवाढ दिली होती. सदर मुदतवाढ संपुष्टात आल्याने आरोग्य सेवा संचालनालयाने उपरोक्त अ.क्र. ६ येथील पत्रान्वये, सदर पदांना मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या "परिशिष्ट-अ" मध्ये नमूद करण्यात आलेल्या उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद यांचे अधिपत्याखालील दंत चिकित्सा विभागातील उपजिल्हा रुग्णालये व ग्रामीण रुग्णालये येथील २८ अस्थायी पदांना दि.०१.०६.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर अस्थायी पदांचे वेतन पुढील लेखाशीर्षामध्ये खर्ची टाकण्यात यावे आणि हा खर्च सन २०२०-२०२१ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| अ.क्र. | लेखाशिर्ष |
|---|---|
| १ | मागणी क्रमांक आर-१ मुख्य लेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०३-ग्रामीण आरोग्य सेवा व विषम चिकित्सा, ११०-रुग्णालये व दवाखाने, ११०-१ इतर रुग्णालये व दवाखाने, (०१)(०१) कुटीर रुग्णालये (२२१० ०३१५)" |
| २ | मागणी क्रमांक आर-१, मुख्य लेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६-सार्वजनिक आरोग्य, ००१-संचालन व प्रशासन, (०१)(०८)-प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रामीण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे (२२१० ०४१३)" |
| ३ | मागणी क्रमांक आर-१ मुख्य लेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०१)(०९)-महाराष्ट्र आरोग्य विकास प्रकल्पांतर्गत ग्रामीण/कुटीर रुग्णालयांचे जिल्हा रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे (अनिवार्य) (२२१० ४६२४)" |

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दिनांक- १२.०२.२०२० च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर पदांना यापुढील कालावधीकरीता मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना, यासोबतच्या "परिशिष्ट-"अ" मधील तक्यात प्रत्येक अरोग्य संस्थेचे नाव, एकूण मंजूर पदे, स्थायी पदे व ॲस्थाची पदे (तपशीलवार माहिती) याबाबतच्या माहितीसह शासनास सादर करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७२९१६३२५०८८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip M Balkavde

Digitally signed by Pradip M Balkavde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra,
2.5.4.20=8db6aab31faca2f1a89698a28c94703436c07cda664672d20607766dc59d345b, serialNumber=ed0fa40788bb5c0d7f76b869fa2e5835af215c6a80eae8f70eaf87b0cf68d63f, cn=Pradip M Balkavde
Date: 2020.08.20 12:58:45 +05'30'

(प्र.मो.बलकवडे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई /नागपूर.
२. आयुक्त,आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
५. सहसंचालक,आरोग्य सेवा, रुग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
६. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई.
७. उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद.
८. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, औरंगाबाद, जालना, परभणी व हिंगोली.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद, जालना, परभणी व हिंगोली.
१०.सर्व संबंधीत रुग्णालये (उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद यांचेमार्फत)
११.वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई
१२.अवर सचिव / कार्यासन अधिकारी (सेवा-१), सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
१३. निवडनस्ती (आरोग्य-४)

परिशिष्ट-अ

(शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक- अपदे-२०२०/प्र.क्र.१८५/आरोग्य-४, दिनांक - २० ऑगस्ट, २०२० सोबतचे विवरणपत्र)

| अ. क्र. | आरोग्य संस्थेचे नाव | एकूण मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|
| | | २८ | ० | प्रत्येकी २ पदे |
| १ | उपजिल्हा रुग्णालय गंगापुर, जि. औरंगाबाद | २ | ० | दंत चिकित्सक, गट-अ (१ पद) |
| २ | उपजिल्हा रुग्णालय अंबड, जि. जालना | २ | ० | सहाय्यक, ग-ड (१ पद) |
| ३ | उपजिल्हा रुग्णालय सेलू, जि.परभणी | २ | ० | |
| ४ | उपजिल्हा रुग्णालय वसमत, जि. हिंगोली | २ | ० | |
| ५ | ग्रामीण रुग्णालय, बिडकीन, जि. औरंगाबाद | २ | ० | |
| ६ | ग्रामीण रुग्णालय, कन्नड, जि. औरंगाबाद | २ | ० | |
| ७ | ग्रामीण रुग्णालय, पाचोड, जि. औरंगाबाद | २ | ० | |
| ८ | ग्रामीण रुग्णालय, पिशोर, जि. औरंगाबाद | २ | ० | |
| ९ | ग्रामीण रुग्णालय, खुलताबाद, जि. औरंगाबाद | २ | ० | |
| १० | ग्रामीण रुग्णालय, देवगाव रंगारी, जि. औरंगाबाद | २ | ० | |
| ११ | ग्रामीण रुग्णालय, मंठा, जि. जालना | २ | ० | |
| १२ | ग्रामीण रुग्णालय, भोकरदन, जि. जालना | २ | ० | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १३ | ग्रामीण रुग्णालय, परतुर, जि. जालना | २ | ० | |
| १४ | ग्रामीण रुग्णालय, बोरी, जि. परभणी | २ | ० | |
| | एकूण | २८ | ०० | २८ अस्थाई पदे |